**शरद ग्रामीण विकास बहुउद्देशिय शिक्षण संस्था, देवळी, जि.वर्धा संचलित शहिद टिपु सुलतान उर्दु उच्च माध्यमिक शाळा, नांदगाव खंडेश्वर, जि.अमरावती या कनिष्ठ महाविद्यालयाचे, मुस्लीम अल्पसंख्यांक बहुउद्देशिय संस्था, अचलपूर, जि.अमरावती संस्थेस हस्तांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह ३११८/प्र.क्र.३५६/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा :</u> शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/ (२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

<u>संदर्भ :</u> विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती यांचे क्र.एचएससी/१९७१/२०१८,दि.२६/०३/२०१८ चे पत्र.

<u>प्रस्तावना :</u>

शरद ग्रामीण विकास बहुउद्देशिय शिक्षण संस्था, देवळी, जि.वर्धा संचलित शहिद टिपु सुलतान उर्दु उच्च माध्यमिक शाळा, नांदगाव खंडेश्वर, जि.अमरावती या उर्दु माध्यमाच्या विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालयाचे, मुस्लीम अल्पसंख्यांक बहुउद्देशिय संस्था, अचलपूर, जि.अमरावती संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय :</u>

सदर कनिष्ठ महाविद्यालयाचे, मुस्लीम अल्पसंख्यांक बहुउद्देशिय संस्था, अचलपूर, जि.अमरावती यांचेकडे हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची कोणत्याही कारणास्तव किमान पटसंख्येची अट शिथील केली जाणार नाही.

(२) शाळेसाठी शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार शाळेसाठी पक्की इमारत, सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील याबाबत नवीन संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टँम्पपेपवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(३) हस्तांतरणास संमती दिलेल्या अर्हता प्राप्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सामावून घेण्यात येईल व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल होणार नाही. याबाबत नवीन संस्थेचे अध्यक्ष/सचिवांचे रू.१००/- च्या स्टँम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(४) शासन निर्णय, दिनांक २८/०८/२०१५ नुसार व याबाबत शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणारे आदेशानुसार अनुज्ञेय होणाऱ्या पदांइतके शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहतील व त्यापेक्षा जास्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहणार नाहीत हे संस्थेस बंधनकारक राहील तसेच अनुज्ञेय पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून भरण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

(५) मुस्लीम अल्पसंख्यांक बहुउद्देशिय संस्थेची बँकेतील शिल्लक व मुदतठेवी याआधारे आर्थिक स्थिती चांगली असल्याची असल्याची खात्री करण्यात यावी.

(६) सदर शाळा अनुदानाच्या ज्या तत्वावर आहे, त्याच तत्वावर हस्तांतरानंतरही कार्यरत राहील.

(७) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/ मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही.

(८) शासनाकडून शाळा, शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/ वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(९) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपध्दतीनुसार अंमलात येईल.

(१०) सदरहू व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदल संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेव्दारा भंग झाल्यास, हस्तांतरण रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्र.(२), (३) व (५) ची पूर्तता झाल्यावर विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांनी सर्व बाबी तपासून आणि आवश्यक अन्य अटींचा समावेश करून, शाळेच्या व्यवस्थापन बदलाबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०८१५५५१२२४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.08.08 15:55:30 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, मालटेकडी रोड, जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था - आवार, अमरावती-६०१ ४४४
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अमरावती
४) अध्यक्ष/ सचिव, शरद ग्रामीण विकास बहुउद्देशिय शिक्षण संस्था, देवळी, जि.वर्धा
५) अध्यक्ष/ सचिव, मुस्लीम अल्पसंख्यांक बहुउद्देशिय संस्था, अचलपूर, जि.अमरावती
६) निवडनस्ती ( एसएम-१)